पदोन्नती
जिल्हा तांत्रिक सेवेतील पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर पदोन्नती व पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन आदेश क्रमांकः पीओजी-२०१८/प्र.क्र.१३८/सेवा-२
## मंत्रालय, मुंबई
## दिनांक: ११.१०.२०१८

## शासन आदेश

सन २०१७-२०१८ च्या निवडसूचीतील खालील तक्त्या मध्ये नमूद केलेल्या जिल्हा तांत्रिक सेवेतील पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४००) यांना, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अधिकारी ( स्थापत्य) ( वेतनश्रेणी रु.१५६०० - ३९१०० ग्रेड पे ५४००) पदावर या आदेशान्वये निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नती नंतर संबंधितांची नियुक्ती त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदविकाधारक कनिष्ठ अभियंता यांचे नांव | पदोन्नतीचा प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला विभागीय संवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १. | श्री.सी.टी.राठी | खुला | नागपूर | सा.बां.उप विभाग, मोहाडी |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबबात विधी व न्याय विभागाने दिनांक २८.१२.२०१७ रोजी दिलेल्या अभिप्रायानुसार खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिलेले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दिनांक २५.५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतुपदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या आहेत.

त्यानुसार श्री.सी.टी.राठी यांची पदोन्नती ही मा.सर्वोच्च न्यायालायत दाखल विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात करण्यात येत आहे. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी श्री.सी.टी.राठी यांना सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

३. श्री.सी.टी.राठी यांच्याविरूध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित /न्यायालयीन प्रकरण/ FIR दाखल नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे. तथापि, त्यांच्याविरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल असल्यास हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

४. श्री.सी.टी.राठी, जिल्हा तांत्रिक सेवेतील पदविकाधारक कनिष्ठ अभियंता यांना शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दि.२८.४.२०१५ व दिनांक १६.७.२०१५ व सुधारित अधिसूचना, दिनांक १५.६.२०१७ मधील तरतुदीनुसार विभागीय संवर्गाचे वाटप करण्यात आले आहे व पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना केलेले ठिकाण/कार्यालय याबाबतचा तपशील परिच्छेद-१ मध्ये मध्ये त्यांच्या नावासमोर नमूद करण्यात आलेला आहे.

५. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना अशी विनंती करण्यात येते की, त्यांच्याकडे नियुक्त असलेले श्री.सी.टी.राठी, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता ( स्था) यांना पदोन्नतीचे व सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तात्काळ कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

६. जर श्री.सी.टी.राठी हे दिनांक ११.११.२०१९ पर्यत पदोन्नतीनंतर देण्यात आलेल्या सविस्तर नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन त्यांच्या पदोन्नतीचे आदेश कसलीही नोटीस न देता रद्द करण्यात येतील. याबाबत नंतर कोणत्याही अभिवेदनाचा विचार केला जाणार नाही यांची संबधितांनी कृपया नोंद घ्यावी.

७. संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग/मुख्य कार्यकारी अधिकारी यांना कळविण्यात येते की, त्यांच्या प्रादेशिक विभागात नियुक्ती दिलेले श्री.सी.टी.राठी हे दिनांक ११.११.२०१८ पर्यत हजर न झाल्यास त्याबाबत शासनास तात्काळ कळवावे. जेणेकरुन शासनस्तरावर पुढील कार्यवाही करणे शक्य होईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१११७१३००३११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind Jagannath Kamble

Digitally signed by Arvind Jagannath Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, serialNumber=9002cefc24afd7333b681924b5ec78d113291ff4a25db398420a06cd457d41f5, cn=Arvind Jagannath Kamble
Date: 2018.10.11 17:17:56 +05'30'

**(अ.ज.कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्राने.
२. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा
५. सह सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अधिक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
७. श्री.सी.टी.राठी, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत.
८. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.मा. राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक , सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१५.कार्यासन प्रशा-२,सेवा-१,सेवा-३,आस्थापना- १/३, सेवा-६, संगणक कक्ष, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई,
१६.कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.